विक्रीकर निरीक्षक (मु)प - 2011



११-१२-२०११

2011

Code : **RRM**

प्रश्नपुस्तिका क्रमांक
BOOKLET No. **103224**

**प्रश्नपुस्तिका**
**मराठी व इंग्रजी**

**वेळ : 2 (दोन) तास**

**एकूण प्रश्न : 200**
**एकूण गुण : 200**

# सूचना

(1) सदर प्रश्नपुस्तिकेत 200 अनिवार्य प्रश्न आहेत. उमेदवारांनी प्रश्नांची उत्तरे लिहिण्यास सुरुवात करण्यापूर्वी या प्रश्नपुस्तिकेत सर्व प्रश्न आहेत किंवा नाहीत याची खात्री करून घ्यावी. असा तसेच अन्य काही दोष आढळल्यास ही प्रश्नपुस्तिका समवेक्षकांकडून लगेच बदलून घ्यावी.

(2) आपला परीक्षा-क्रमांक ह्या चौकोनांत **न विसरता बॉलपेनने** लिहावा.

| परीक्षा-क्रमांक | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | केंद्राची संकेताक्षरे | | | | | | | शेवटचा अंक |

(3) वर छापलेला प्रश्नपुस्तिका क्रमांक तुमच्या उत्तरपत्रिकेवर विशिष्ट जागी उत्तरपत्रिकेवरील सूचनेप्रमाणे **न विसरता नमूद करावा.**

(4) या प्रश्नपुस्तिकेतील प्रत्येक प्रश्नाला 4 पर्यायी उत्तरे सुचविली असून त्यांना 1, 2, 3 आणि 4 असे क्रमांक दिलेले आहेत. त्या चार उत्तरांपैकी सर्वात योग्य उत्तराचा क्रमांक उत्तरपत्रिकेवरील सूचनेप्रमाणे तुमच्या उत्तरपत्रिकेवर नमूद करावा. अशा प्रकारे उत्तरपत्रिकेवर उत्तरक्रमांक नमूद करताना तो संबंधित प्रश्नक्रमांकासमोर छायांकित करून दर्शविला जाईल याची काळजी घ्यावी. **ह्याकरिता फक्त काळ्या शाईचे बॉलपेन वापरावे, पेन्सिल वा शाईचे पेन वापरू नये.**

(5) सर्व प्रश्नांना समान गुण आहेत. यास्तव सर्व प्रश्नांची उत्तरे द्यावीत. घाईमुळे चुका होणार नाहीत याची दक्षता घेऊनच शक्य तितक्या वेगाने प्रश्न सोडवावेत. क्रमाने प्रश्न सोडविणे श्रेयस्कर आहे पण **एखादा प्रश्न कठीण वाटल्यास त्यावर वेळ न घालविता पुढील प्रश्नाकडे वळावे.** अशा प्रकारे शेवटच्या प्रश्नापर्यंत पोहोचल्यानंतर वेळ शिल्लक राहिल्यास कठीण म्हणून वगळलेल्या प्रश्नांकडे परतणे सोईस्कर ठरेल.

(6) उत्तरपत्रिकेत एकदा नमूद केलेले उत्तर खोडता येणार नाही. नमूद केलेले उत्तर खोडून नव्याने उत्तर दिल्यास ते तपासले जाणार नाही.

(7) **प्रस्तुत परीक्षेच्या उत्तरपत्रिकांचे मूल्यांकन करताना उमेदवाराच्या उत्तरपत्रिकेतील योग्य उत्तरांनाच गुण दिले जातील. तसेच ''उमेदवाराने वस्तुनिष्ठ बहुपर्यायी स्वरूपाच्या प्रश्नांची अचूक उत्तरेच उत्तरपत्रिकेत नमूद करावीत. अन्यथा त्यांच्या उत्तरपत्रिकेत सोडविलेल्या प्रत्येक चार चुकीच्या उत्तरांसाठी एका प्रश्नाचे गुण वजा करण्यात येतील''.**

**पर्यवेक्षकांच्या सूचनेविना हे सील उघडू नये**

**SEAL**

## ताकीद

**ह्या प्रश्नपत्रिकेसाठी आयोगाने विहित केलेली वेळ संपेपर्यंत ही प्रश्नपुस्तिका आयोगाची मालमत्ता असून ती परीक्षाकक्षात उमेदवाराला परीक्षेसाठी वापरण्यास देण्यात येत आहे. ही वेळ संपेपर्यंत सदर प्रश्नपुस्तिकेची प्रत/प्रती, किंवा सदर प्रश्नपुस्तिकेतील काही आशय कोणत्याही स्वरूपात प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणे कोणत्याही व्यक्तीस पुरविणे, तसेच प्रसिद्ध करणे हा गुन्हा असून अशी कृती करणाऱ्या व्यक्तीवर शासनाने जारी केलेल्या ''परीक्षांमध्ये होणाऱ्या गैरप्रकारांना प्रतिबंध करण्याबाबतचा अधिनियम-82'' यातील तरतुदीनुसार तसेच प्रचलित कायद्याच्या तरतुदीनुसार कारवाई करण्यात येईल व दोषी व्यक्ती कमाल एक वर्षाच्या कारावासाच्या आणि/किंवा रुपये एक हजार रकमेच्या दंडाच्या शिक्षेस पात्र होईल.**

**तसेच ह्या प्रश्नपत्रिकेसाठी विहित केलेली वेळ संपण्याआधी ही प्रश्नपुस्तिका अनधिकृतपणे बाळगणे हा सुद्धा गुन्हा असून तसे करणारी व्यक्ती आयोगाच्या कर्मचारीवृंदापैकी, तसेच परीक्षेच्या पर्यवेक्षकीयवृंदापैकी असली तरीही अशा व्यक्तीविरुद्ध उक्त अधिनियमानुसार कारवाई करण्यात येईल व दोषी व्यक्ती शिक्षेस पात्र होईल.**

**पुढील सूचना प्रश्नपुस्तिकेच्या अंतिम पृष्ठावर पहा**

1. 'ते खरं नव्हं आणि तुमचं खरं व्हय'. वाक्यप्रकार ओळखा.

(1) मिश्र वाक्य
(2) संयुक्त वाक्य
(3) केवल वाक्य
(4) केवल मिश्र वाक्य

2. 'वृक्षवल्ली आम्हा सोयरी' या काव्यपंक्तीतील तत्सम शब्द ओळखा.

(1) वृक्ष
(2) वल्ली
(3) सोयरी
(4) कोणताच नाही

3. 'आम्ही भारतीय नागरिक भारताशी प्रामाणिक आहोत'. या वाक्यातील उद्देश्य ओळखा.

(1) आम्ही भारतीय नागरिक
(2) भारतीय नागरिक
(3) आज भारताशी
(4) प्रामाणिक आहोत

4. पुढे दिलेल्या वाक्यांमधील भावकर्तृक क्रियापद असलेले वाक्य ओळखा.

(1) आई बाळाला हसविते
(2) आईच्या आठवणीने प्रज्ञाचे डोळे पाणावले
(3) आई घरी पोचण्यापूर्वीच सांजावले
(4) आईने स्वत:च जेवण बनविले

5. 'अद्यापिही आपण लोकांना जुन्या चाकोरीच्या बाहेर काढू शकलेलो नाही' या वाक्यतील विधेय विस्तार ओळखा.

(1) अद्यापिही
(2) जुन्या चाकोरीच्या बाहेर काढू शकलेलो नाही
(3) लोकांना जुन्या चाकोरीच्या बाहेर
(4) लोकांना बाहेर काढू शकलेलो नाही

6. सामान्य लोकात अपवादाने आढळणारा सज्जन' – याशब्दसमूहासाठी योग्य शब्द निवडा.

(1) युगपुरुष
(2) युगप्रवर्तक
(3) लेखक
(4) लोकोत्तर

7. 'मी जे जे पाहिले, अनुभवले, ते ते मी साहित्यातून मांडले'. या वाक्यातील प्रधान वाक्य ओळखा.

(1) मी, जे जे साहित्यातून मांडले
(2) मी जे जे पाहिले, अनुभवले
(3) ते ते मी पाहिले अनुभवले
(4) साहित्यातून मांडले

8. 'लाज नाही मना, कोणी काही म्हणा'– या म्हणीच्या विरुद्धार्थी म्हण ओळखा.

(1) वासरात लंगडी गाय शहाणी.
(2) लेकी बोले सुने लागे.
(3) गाढवाला गुळाची चव काय ?
(4) शहाण्याला शब्दाचा मार.

कच्च्या कामासाठी जागा/SPACE FOR ROUGH WORK

**9.** पुढील वाक्याचे विधानार्थी वाक्यात रूपांतर कसे होईल ? 'केवढी उंच इमारत ही'.

(1) किती उंच इमारत ही
(2) उंच इमारत, ही किती आहे
(3) ही इमारत खूप उंच आहे
(4) खूप उंच आहे ही इमारत

---

**10.** 'सासरा' हा शब्द कोणत्या प्रकारचा आहे ?

(1) देशी (2) तत्सम (3) तद्भव (4) अभ्यस्त

---

**11.** पुढील दोन वाक्यांचे एक केवल वाक्य करा.

अ) अर्जुनाने फिरत्या मत्स्याच्या डोळ्याचा नेम धरला
ब) अर्जुनाने बाण सोडला.

(1) अर्जुनाने नेम धरला व फिरत्या मत्स्याच्या डोळ्यावर बाण सोडला
(2) अर्जुनाने फिरत्या मत्स्याच्या डोळ्याचा नेम धरला व बाण सोडला
(3) अर्जुनाने फिरत्या मत्स्याच्या डोळ्याचा नेम धरून बाण सोडला
(4) अर्जुनाने बाण सोडला तो फिरत्या मत्स्याच्या डोळ्याचा नेम घेऊन

---

**12.** 'ळ' हा ______________ वर्ण मानला जातो.

(1) स्वतंत्र (2) महाप्राण (3) संयुक्त स्वर (4) स्वर

---

**13.** 'मी रोज सकाळी पहाटे उठतो व एक तासभर शाळेचा अभ्यास करतो'. या वाक्याचा वाक्यप्रकार ओळखा.

(1) संयुक्त वाक्य
(2) केवल वाक्य
(3) मिश्र वाक्य
(4) विकल्प बोधक वाक्य

---

**14.** खालील कोणता शब्द गुजराथी भाषेतून आला आहे ?

(1) शिकेकाई (2) साबण (3) रिकाम टेकडा (4) अण्णा

---

**15.** 'गुरूजी म्हणाले, की 'एकी हेच बळ' या वाक्यात 'एकी हेच बळ' हे वाक्य ______________ वाक्य आहे.

(1) गौण वाक्य (2) प्रधान वाक्य (3) विशेषण वाक्य (4) नाम वाक्य

---

**16.** थरथर, चूरचूर, खळखळ, सळसळ, ओरड, पीक – हे शब्द कोणते धातू आहेत ?

(1) कृतिवाचक धातू
(2) अकर्मक धातू
(3) उभयविध क्रियापदे
(4) सकर्मक क्रियापदे

---

कच्च्या कामासाठी जागा/SPACE FOR ROUGH WORK

17. कालवाचक क्रिया विशेषण अव्यय ओळखा.

(1) अलीकडे (2) तूर्त (3) आपोआप (4) अतिशय

---

18. 'तू मुद्दाम मला त्रास दिला' – या वाक्यातील अधोरेखित शब्द कोणते क्रियाविशेषण अव्यय आहे ?

(1) परिणाम वाचक (2) कालवाचक (3) रीतिवाचक (4) स्थलवाचक

---

19. 'सापाला का कोणी दूध पाजील' या वाक्यातून कोणता भाव व्यक्त होतो ?

(1) संकेतार्थ (2) प्रश्नार्थ (3) उद्‌गारार्थ (4) नकारार्थ

---

20. उद्‌गारार्थी वाक्य ओळखा.

(1) त्याच्या मनात प्रचंड वादळ उठलं होतं !

(2) मनात त्याच्या उठलं होतं प्रचंड वादळ !

(3) कसलं प्रचंड वादळ उठलं होतं त्याच्या मनात !

(4) त्याच्या मनात उठलं होतं प्रचंड वादळ !

---

21. "परमेश्वरा, मला चांगली बुद्धी दे" – या वाक्याचा प्रकार ओळखा.

(1) आज्ञार्थी (2) स्वार्थी (3) संकेतार्थी (4) विध्यर्थी

---

22. खाली दिलेल्या वाक्यसमूहातून म्हण शोधून काढा.

"नदी किंवा ओढा यात पाणी कमी असले की, त्यातील दगड गोट्यावरून पाणी वाहताना पाण्याचा खळखळ असा आवाज होतो. उलट पाणी विपुल असले की, असा आवाज होत नाही. हीच गोष्ट माणसाची आहे. विद्वत्ता बेताचीच असते, तो खूप बढाया मारताना आढळतो. पण ज्याला त्या विषयाचे ज्ञान असते तो शांत असतो उगाच बडबड करीत नाही".

(1) 'आडात नाही तर पोहऱ्यात कुठून येणार'.

(2) 'संथ वाहते कृष्णामाई'.

(3) 'उथळ पाण्याला खळखळाट फार'.

(4) 'वळणाचे पाणी वळणाने जाणार'.

---

23. 'अती शहाणा त्याचा बैल रिकामा' या म्हणीसाठी पुढील पर्यायातून योग्य अर्थ निवडा.

(1) कोणत्याही गोष्टीचा अतिरेक हा वाईटच असतो.

(2) दोन्हीकडून सारख्याच अडचणीत सापडणे.

(3) अतिशय उतावळेपणाने होणारे मूर्खपणाचे वर्तन.

(4) वाजवीपेक्षा जास्त शहाणपण नुकसानकारक ठरते.

---

कच्च्या कामासाठी जागा/SPACE FOR ROUGH WORK

24. पुढे दिलेल्या म्हणीचा अर्थ खाली दिलेल्या पर्यायातून शोधून काढा.

'साखरेचे खाणार त्याला देव देणार'.

(1) गोड बोलून मोहपाशात पाडणे.

(2) गोड वाटून जीवनाचा आनंद लुटणे.

(3) ज्याच्याकडे खाण्यापिण्याची चंगळ आहे त्याला देव साखर देतो.

(4) भाग्यवान माणसाला देव अनुकूल होतो.

---

25. 'प्रतिस्पर्ध्याशी टक्कर देताना त्याचे पाणी ओळखूनच डावपेच आखावेत' – या वाक्यातील अधोरेखित शब्दाचा ध्वन्यर्थ ओळखा.

(1) मन (2) लायकी (3) अनुभव (4) शूरत्व

---

26. 'गाढवापुढे वाचली गीता, कालचा गोंधळ बरा होता' या म्हणीस समानार्थी म्हण ओळखा.

(1) 'ये रे माझ्या मागल्या ताककण्या चांगल्या'.

(2) 'गाढवाचा नांगर फिरणे'.

(3) 'गाढवाला गुळाची चव काय ?'

(4) 'नाव मोठे लक्षण खोटे'.

---

27. अभ्यस्त शब्द ओळखा.

(1) शेजारी-पाजारी (2) खेळकर (3) उनाडकी (4) राजकीय

---

28. 'एकाचवेळी काही तरी नुकसान होते त्याचवेळी दुसरा काही तरी फायदा होतो'. या दिलेल्या स्पष्टीकरणासाठी योग्य म्हण शोधा.

(1) 'आंधळा मागतो एक डोळा देव देतो दोन डोळे'.

(2) 'आजा मेला नातू झाला'.

(3) 'भटाला दिली ओसरी भट हळू हळू पाय पसरी'.

(4) 'डोंगर पोखरुन उंदीर काढणे'.

---

29. विध्यर्थी वाक्य म्हणजे ______________

(1) क्रियापदाच्या रूपावरून नुसताच काळाचा बोध होत असेल.

(2) क्रियापदाच्या रूपावरून आज्ञा, आशीर्वाद, प्रार्थना, विनंती, उपदेश यांचा बोध होत असेल.

(3) क्रियापदाच्या रूपावरून कर्तव्य, शक्यता, योग्यता, इच्छा यांचा बोध होत असेल.

(4) क्रियापदाच्या रूपावरून अट किंवा संकेत यांचा अर्थ प्रकट होत असेल.

---

कच्च्या कामासाठी जागा/SPACE FOR ROUGH WORK

30. 'नाकापेक्षा मोती जड' या म्हणीचा समर्पक अर्थ निवडा.

(1) मालकापेक्षा नोकर शिरजोर असणे.

(2) नोकरापेक्षा मालक शिरजोर असणे.

(3) नोकर आणि मालक शिरजोर असणे.

(4) नोकर आणि मालक यांच्यावर शिरजोर असणे.

---

31. शुद्ध शब्द ओळखा.

(1) शरदचंद्र (2) शारिरीक (3) शारीरीय (4) शारदिय

---

32. संयुक्त वाक्य म्हणजे ______________

(1) एकच उद्देश्य व एकच विधेय असलेले वाक्य.

(2) उभयान्वयी अव्ययांनी जोडलेले वाक्य.

(3) एक प्रधानवाक्य व त्यावर अवलंबून असलेले दुसरे वाक्य.

(4) अनेक वाक्यांचे एकत्रित केलेले वाक्य.

---

33. खालीलपैकी कोणता वर्ण अनुनासिक नाही ?

(1) न (2) ण (3) ङ् (4) ज्ञ

---

34. ज्याच्या बायका एकी मागोमाग मरत आल्या आहेत असा पुरुष ____________

(1) बाईल माऱ्या (2) बाईल वेडा

(3) बाईल खाद्या (4) बाईल बुद्ध्या

---

35. 'कणीक तिंबणे' या वाक्प्रचाराचा अर्थ ओळखा.

(1) कणीक भिजवणे (2) खूप मारणे

(3) सूड उगवणे (4) अंदाज करणे

---

36. वाक्याचा प्रकार ओळखा.

'जरी बाहेरून सर्व कारभार सुरळीत चाललेला दिसत असला, तरी आत खळबळ उडालेली होती ?

(1) केवल वाक्य (2) मिश्र वाक्य

(3) संयुक्त वाक्य (4) उद्गारार्थी

---

37. 'भीतीपोटी प्रत्येक गोष्टीस नकार घंटा वाजविणारा घाबरट मनुष्य ' – या वाक्यबंधासाठी योग्य पर्यायी शब्द निवडा.

(1) शुक्राचार्य
(2) शिराळशेट
(3) रडतराऊत
(4) पाताळयंत्री

38. 'तो गातो' या वाक्यात ________________ नाही.

(1) कर्म
(2) कर्ता
(3) क्रियापद
(4) विशेषण

39. म्हण पूर्ण करा :

' शिकविलेली बुद्धी आणि ______________ फार काळ टिकत नाही'.

(1) बांधलेली दोरी
(2) बांधलेली शिदोरी
(3) बांधलेले घोडे
(4) बांधलेले मांजर

40. 'अवरोहण' या शब्दाला विरुद्धार्थी शब्द निवडा.

(1) उन्नत
(2) अवनत
(3) आरोहण
(4) प्रारंभ

खालील उतारा वाचून त्या खालील प्रश्न क्र. 41 ते 45 ची उत्तरे लिहा :

मराठी भाषा मरणोन्मुख झालेली आहे असे कुणीच म्हणणार नाही. तिची प्रकृती कदाचित राहावी तितकी बरोबर राहात नसेल. शास्त्रीय वाङ्मयाचा व्यायाम घेण्याचा तिला कंटाळा आहे. प्रेमाची खमंग फोडणी दिलेले पदार्थच तिला फार आवडतात. तिची वेषभूषा अगदी आजच्या घटकेला शोभणारी असली, तरी मन मात्र अजून मागच्या काळात रेंगाळत आहे, इत्यादी आक्षेपांत थोडासा तथ्यांश असला तरी तिच्या या तक्रारी काही कायम टिकणाऱ्या नाहीत. ज्यांचे आसन सरस्वती मंदिरात स्थिर झाले आहे, अशा लोकप्रिय ललित लेखकांनी आपल्या आवडीच्या शास्त्राविषयी वाङ्मय निर्माण करण्याचे ठरविले तर ते काय त्यांना अशक्य आहे ? 'गरज तसा पुरवठा' हे तत्त्व मला वाङ्मयातही मान्य आहे; पण ते पाळताना लेखकाने व्यापारी होऊ नये. डॉक्टर व्हावे. रोग्याच्या शरीराला ज्या ज्या द्रव्याची जरूरी असते ती ती औषधांच्या द्वारे त्याला देणे हेच डॉक्टरांचे कर्तव्य नव्हे का ? शिवाय गरज तसा पुरवठा या तत्त्वाइतकेच 'गरज ही कल्पकतेची आई ' हे तत्त्वही प्रसिद्ध आहे. म्हणजे पुरवठा व कल्पकता यांचे बहीण-भावंडाचे नाते होते. हे नाते पाळण्याची दक्षता लेखकांनी घ्यायला नको का ?

41. मराठी भाषेविषयी कोणते आक्षेप घेतले जातात ?

(1) शास्त्रीय वाङ्मयाचा व्यायाम घेण्याचा तिला कंटाळा आला आहे.
(2) मराठी भाषेचे मन आधुनिक आहे.
(3) मराठी भाषेची वेषभूषा जुनीच आहे.
(4) मराठी भाषेची प्रकृती अगदी उत्तम आहे.

42. वाङ्मयात कोणते तत्त्व लेखकाला मान्य आहे ?

(1) रोग्याच्या शरीराला औषधाद्वारे द्रव्य देणे

(2) गरज तसा पुरवठा

(3) पुरवठा व कल्पकता यांचे मायलेकांचे नाते

(4) यापैकी कोणतेच नाही

43. ललित लेखकांकडून कोणती अपेक्षा व्यक्त केली आहे ?

(1) आवडणारा विषयच लेखनात आणू नये

(2) लोकप्रिय साहित्य लिहावे

(3) लेखकाने व्यापारी होऊ नये

(4) 'गरज तसा पुरवठा' या न्यायाने साहित्यलेखन करावे

44. 'गरज तसा पुरवठा' याप्रमाणेच दुसरे कोणते तत्त्व प्रसिद्ध असल्याचे लेखक म्हणतो ?

(1) पुरवठा व कल्पकता यांचे आईमुलाचे नाते

(2) गरज ही कल्पकतेची आई

(3) गरज हे एक औषध

(4) रोग तसे औषध

45. ललित लेखकांनी कोणते नाते पाळण्याची दक्षता घ्यावी, असे लेखकास वाटते ?

(1) पुरवठा व कल्पकता यांचे बहीण भावंडाचे नाते पाळण्याची

(2) वाचकांच्या मनाला पटेल तसे लिहिण्याची

(3) मनाला वाटेल तसेच लिहिण्याची

(4) गरजेप्रमाणे लिहिण्याची

खालील उतारा वाचून त्या खालील प्रश्न क्र. **46** ते **50** ची उत्तरे लिहा :

मला इथं मूळ धर्म म्हणजे मानवी धर्म, माणूस धर्म वगैरे काहीच म्हणायचं नाही. आपण फक्त ज्यांना स्वत:ची नावं आहेत. तेवढ्याच धर्माबद्दल बोलू या. म्हणजे हिंदू , मुस्लिम, ख्रिश्चन वगैरे ... मूळ मानवी धर्म, माणूस धर्म यांचा आपल्याला आवाकाच राहिलेला नाही. सगळं जग धर्माच्या ढोंगांनी एवढं बरबटलंय, की त्या खातेऱ्यातून मूळ मानवी धर्मापर्यंत जायला शतकानुशतकं लागतील.

**कच्च्या कामासाठी जागा/SPACE FOR ROUGH WORK**

आज किती भयानक चित्र आहे ? कुणाही हिंदूला आपण हिंदू आहोत, म्हणजे काय, ते कळत नाही. कुणाही मुसलमानाला आपण मुसलमान आहोत म्हणजे काय, ते कळत नाही. असं सगळ्याच लोकांचं आणि सगळ्याच धर्मांचं धार्मिक भरीत झालं आहे आणि तरीही हे लोक स्वत:ला धार्मिक म्हणवतात ? धर्माचा फुकटचा अभिमान बाळगत एकमेकांवर तुटून पडतात ? मी ठामपणे सांगतो की, ज्याला स्वत:चा धर्म नीट माहित आहे, ज्याचा स्वत:च्या धर्माचा बारकाईने अभ्यास आहे आणि जो स्वत:च्याच धर्माचे नियम काटेकोरपणे पाळतो, तो माणूस कधीही दुसऱ्याशी वैर बाळगणार नाही. कुणाशीही दंगल करायला जाणार नाही. कुणाचाही द्वेष करणार नाही. तो स्वत: शांत जगेल आणि दुसऱ्यालाही शांततेनं जगू देईल. आजचं जग अशांत राहायला, अस्वस्थ राहायला हे स्वत:च्याच धर्माबाबत अडाणी असलेले लोक कारणीभूत आहेत, यांची स्वत:चेच धर्म पाळायची लायकी नाही, तर हे या धर्माच्या चौकटी बाहेर असणारा उदात्त आणि मूलभूत मानवी धर्म काय पाळणार आहेत ?

46. संपूर्ण जग कशानं बरबटलंय ?

(1) अशांततेनं
(2) धर्म पाळल्याने
(3) दंगली केल्यामुळे
(4) धर्माच्या ढोंगांनी

---

47. आपण कोणत्या धर्माच्या आवाक्यात राहिलो नाही ?

(1) हिंदू धर्म
(2) मुस्लिम धर्म
(3) ख्रिश्चन धर्म
(4) माणूस धर्म

---

48. सगळ्याच लोकांचं आणि सगळ्याच धर्माचं धार्मिक भरीत झालं आहे, कारण _______________

(1) शांततेने जीवन जगल्यामुळे
(2) धर्म म्हणजे काय ? हे न कळल्यामुळे
(3) धर्माचा फुकटचा अभिमान बाळगल्यामुळे
(4) एकमेंकावर तुटून पडल्यामुळे

---

49. आजचे जग अशांत व अस्वस्थ राहायला कारणीभूत असणारे लोक कोण ?

(1) स्वत:च्याच धर्माबाबत अडाणी असणारे
(2) स्वत:च्या धर्माचा बारकाईने अभ्यास करणारे
(3) स्वत: शांत जीवन जगणारे
(4) दुसऱ्याशी वैरभाव न बाळगणारे

---

50. या उताऱ्यास समर्पक शीर्षक सूचवा.

(1) धर्माबद्दलची दांभिकता

(2) आजची धार्मिक स्थिती

(3) मूलभूत मानवी धर्म

(4) धर्माची चौकट

---

51. 'गंधाक्षत' या शब्दाला समानार्थी शब्द निवडा.

(1) विवाह सोहळ्यातील रंगविलेले तांदूळ
(2) सन्मानाने देवाला लावण्याचा टिळा
(3) मंतरलेले गंधयुक्त तांदूळ
(4) हाती तांदूळ घेऊन मंत्र पुटपुटणे

---

52. 'दोरीचं खांड' या शब्दाचा अर्थ पुढीलपैकी कोणत्या शब्दातून व्यक्त होतो ?

(1) दोरीचा तुकडा
(2) दोरीचा कासरा
(3) दोरीची वळण
(4) दोरीचा पीळ

---

53. 'आसुडणे' ही क्रिया खालीलपैकी कशाशी संबंधित आहे ?

(1) दळणे (2) कांडणे (3) वेचणे (4) पाखडणे

---

54. 'लग्न समारंभातील वधूपक्षाकडून वर पक्षाला दिली जाणारी अखेरची मेजवानी' – या वाक्यसमूहासाठी असणारा शब्द ओळखा.

(1) मांडव भोजन (2) केळवण (3) मांडव परतणी (4) गडगनेर

---

55. धान्य ठेवण्याच्या पात्राला खालीलपैकी कोणते नाव आहे ?

(1) कणिका (2) कणशी (3) कणगर (4) कणगी

---

56. एखाद्या शब्दसमूहाला किंवा शब्दाला पूर्ण अर्थ प्राप्त झाला आहे. तर त्याला ____________ असे म्हणतात.

(1) वाक्य (2) सर्वनाम (3) क्रियापद (4) केवल प्रयोगी

---

57. शरीर, मन, वाचा यांचे नियमन करणारा सन्यास घेण्याचा एक प्रकार कोणता ?

(1) त्रिदण्डी (2) त्रिताल (3) त्रिताप (4) त्रिदश

---

कच्च्या कामासाठी जागा/SPACE FOR ROUGH WORK

58. 'मन्वंतर' या जोड शब्दाची संधी ओळखा.

(1) मन + अंतर
(2) मन्व + अंतर
(3) मनु + अंतर
(4) मन व अंतर

59. ओढाळ जनावरांच्या दोन पायांना बांधलेल्या दोरीला काय म्हणतात ?

(1) दुपकी
(2) दुपांडी
(3) दुपटे
(4) दुबंधी

60. 'धांदरट धनंजय धावतांना धपकन पडला' या वाक्यातील क्रियाविशेषण ओळखा.

(1) धांदरट
(2) धावतांना
(3) धपकन
(4) पडला

61. 'वाघ्या' या शब्दाच्या विरुद्धलिंगी शब्द ओळखा.

(1) वाघीण
(2) वाघी
(3) मुरळी
(4) मुरळीण

62. 'इत्थंभूत' या शब्दाच्या उलट अर्थाचा शब्द निवडा.

(1) त्रोटक
(2) सारखा
(3) निराळा
(4) समान

63. 'मोहन नीताला तिच्या परोक्ष बोलला होता' या वाक्यातील 'परोक्ष' शब्दाच्या विरुद्ध असणारा शब्द निवडा.

(1) उपकार
(2) अपरोक्ष
(3) परिधान
(4) उपेक्षित

64. "दुसऱ्याचा लहानसा दोषही आपल्याला दिसतो, पण स्वार्थीवृत्तीमुळे स्वत:च्या मोठ्या दोषाकडेही लक्ष जात नाही" – या वाक्यातील 'स्वत:चा मोठा दोष' साठी पुढील कोणता शब्द निवडाल ?

(1) डोळ्यातील कुसळ
(2) डोळ्यातील मुसळ
(3) डोळ्यातील मोतीबिंदू
(4) डोळ्यातील कचरा

65. पुढील जोड्यांपैकी कोणती जोडी विरुद्ध अर्थाची जोडी बरोबर आहे ते ओळखा.

(1) नम्रता – उद्धटपणा
(2) आढ्यता – गूढता
(3) हेकेखोरपणा – हट्टीपणा
(4) चिडखोरपणा – तापटपणा

66. 'तळ पायाची आग मस्तकाला जाणे' – या वाक्प्रचाराचा विरुद्ध अर्थाचा वाक्प्रचार कोणता ?

(1) अंतरीचा तळीराम गार होणे
(2) आनंदाच्या उकळ्या फुटणे
(3) जमदग्नीचा अवतार
(4) कानउघाडणी करणे

67. "वाघ म्हटले तरी खातोच आणि ____________" - ही म्हण पूर्ण करा.
(1) नागोबा म्हटले तरी खातोच
(2) बोकोबा म्हटले तरी खातोच
(3) दादोबा म्हटले तरी खातोच
(4) वाघोबा म्हटले तरी खातोच

68. 'देवळाच्या कळसाखाली असलेली डेऱ्याच्या आकाराची बंदिस्त जागा' या शब्दसमूहास खालीलपैकी एक शब्द योग्य तो सुचवा.
(1) गाभारा (2) घुमट (3) चबुतरा (4) आसन

69. पुढीलपैकी कोणता शब्द त्याच्या समानार्थी रूपात तीनही लिंगे बदलतो ?
(1) दार (2) शरीर (3) प्रासाद (4) शक्ती

70. 'नेहमी घरात बसून राहणारा' या शब्दसमूहासाठी पुढीलपैकी योग्य पर्याय निवडा.
(1) परात्म (2) ऐतखाऊ (3) घरकोंबडा (4) एकलकोंडा

71. 'आपली पाठ आपणास दिसत नाही' - या म्हणीचा योग्य अर्थ कोणता ?
(1) आपल्या पाठीला डोळे नसणे
(2) स्वत:चे दोष दिसत नाहीत
(3) फक्त स्वत:चाच विचार करणे
(4) आपले रहस्य उघडे पडू नये म्हणून गप्प बसणे

72. 'सहा महिन्यांतून एकदा प्रसिद्ध होणारे' या शब्द समूहासाठी पुढीलपैकी कोणता योग्य शब्द आहे ते ओळखा.
(1) मासिक
(2) दैनिक
(3) सामासिक
(4) षण्मासिक

73. 'काळाची पावले ओळखून बाळासाहेबांनी आपल्या मुलाला - विश्वजितला आंतरधर्मीय विवाहासाठी परवानगी दिली' - या वाक्यातील 'काळाची पावले' या शब्दासाठी पुढील कोणता पर्याय योग्य वाटतो ?
(1) अतिशय राग येऊन
(2) बदलत्या परिस्थितीचे भान ठेऊन
(3) काळाला घाबरून
(4) विश्वजितने टाकलेले पाऊल पाहून

74. विद्यापीठाने नेमून दिलेल्या कामात अजयने कोणतीही कसर केली नाही. या वाक्यातील अनेकार्थी शब्द ओळखा.
(1) जबाबदारी (2) कोणतीही (3) कसर (4) नेमून

75. 'विविध प्रकारचे अनुभव आल्याने माणूस व्यवहारात चतुर होतो' - या वाक्यासाठी पुढील समर्पक वाक्यबंध निवडा.
(1) भगीरथ प्रयत्न करणे
(2) कानोसा घेणे
(3) बारा गावचे पाणी पिणे
(4) लष्कराच्या भाकरी भाजणे

कच्च्या कामासाठी जागा/SPACE FOR ROUGH WORK

**76.** पुढे दिलेल्या शब्दसमूहाबद्दल एक शब्द खाली दिलेल्या पर्यायातून निवडा. 'दुसऱ्यावर उपकार करणारा'.

(1) परावलंबी (2) पुरोगामी (3) पराधीन (4) परोपकारी

---

**77.** नामाच्या रूपावरून पुरुष जातीचा अथवा स्त्रीजातीचा बोध न होता, त्या दोहोंहून भिन्न अशा जातीचा बोध होतो. त्यास __________ म्हणतात.

(1) पुल्लिंग (2) स्त्रीलिंग (3) नपुंसकलिंग (4) शिवलिंग

---

**78.** 'पलिकडे, वड, पिंपळ वगैरे झाडाभोवतालचा ओटा' या अर्थाचा आशय स्पष्ट करणारा एक शब्द निवडा.

(1) कट्टा (2) पार (3) चावडी (4) ग्रामसभेची जागा

---

**79.** मराठी भाषेत मूळ सर्वनामे किती आहेत ?

(1) 12 (2) 09 (3) 15 (4) 07

---

**80.** 'पंकज' या शब्दातील ध्वन्यर्थ पुढीलपैकी कोणत्या वाक्यातून स्पष्ट होतो ते सांगा.

(1) चिखलात जन्मलेले किटक
(2) कमळ
(3) दलदलीत वाढणारे
(4) पाण्यावर फुललेले फुल

---

**81.** 'पुराणातील वांगी पुराणात' – या म्हणीचा अर्थ पुढील कोणत्या संदर्भासाठी योग्य ठरतो ते ओळखा.

(1) कोठून तरी कसा तरी जोडलेला संबंध
(2) जेथील गोष्ट तेथेच लागू पडते
(3) एखाद्याचा डाव त्याच्यावरच उलटणे
(4) सगळी माणसे सारख्या स्वभावाची असणे

---

**82.** 'मुख्यार्थबाध' हे कशाचे निमित्त आहे ?

(1) अभिधा (2) लक्षणा (3) व्यंजना (4) यापैकी नाही

---

**83.** पुढे दिलेल्या पर्यायातून नामसाधित विशेषण ओळखा.

(1) रांगणारे मूल
(2) पिकलेला आंबा
(3) पेणचे गणपती
(4) वरचा मजला

---

**84.** 'ज्याला आई, वडील नाहीत असा असलेला' या शब्दसमूहासाठी योग्य पर्याय निवडा.

(1) सनाथ (2) दुबळा (3) पोरका (4) वनवासी

---

**कच्च्या कामासाठी जागा/SPACE FOR ROUGH WORK**

85. वाक्याचा अर्थ पूर्ण करणारा क्रियावाचक शब्द ________

(1) क्रियापद (2) धातू (3) कर्म (4) कर्ता

86. 'क्रिकेट खेळताना मनोहरने युवराजची खोड काढली' या वाक्यातील 'खोड' शब्दाचा अर्थ काय सांगता येईल ?

(1) झाडाचा बुंधा (2) अवगुण दाखविणे (3) चेष्टा करणे (4) मस्ती करणे

87. पुढील स्वर जोड्यातून सजातीय स्वर जोडी ओळखा.

(1) उ - ऊ (2) अ - इ (3) इ - ए (4) अ - ई

88. 'मांजराकडून उंदीर मारला गेला' - हे वाक्य कोणत्या प्रयोगातील आहे ?

(1) भावकर्तरी प्रयोग (2) भावे प्रयोग

(3) कर्मणी प्रयोग (4) कर्म-भाव संकर प्रयोग

89. पुढीलपैकी अल्पप्राण व्यंजन कोणते ते निवडा.

(1) प् (2) ख् (3) भ् (4) ध्

90. पुढील पर्यायांपैकी कोणता शब्द शुद्ध लेखनाच्या दृष्टीने योग्य आहे ते ओळखा.

(1) षष्ठ्यब्दिपूर्ती (2) षष्ठ्यब्दिपुर्ति

(3) षष्ट्यब्दीपूर्ती (4) षष्ट्यब्दिपुर्ति

91. पुढीलपैकी कोणते दोन वर्ण जोडाक्षरे आहेत ?

(1) ग, घ (2) ज, झ (3) प, फ (4) क्ष, ज्ञ

92. 'मला संकष्टी चतुर्थीला चंद्र दिसला' - या वाक्यातील कर्ता ओळखा.

(1) मी (2) संकष्टी चतुर्थी (3) चंद्र (4) दिसणे

93. स्वर संधी म्हणजे ________

(1) जवळ जवळ येणाऱ्या दोन वर्णांपैकी एक स्वर व दुसरा व्यंजन जोडणे.

(2) एकमेकाशेजारी येणारे दोन स्वर जोडले जाणे.

(3) एकत्र येणाऱ्या वर्णातील पहिला विसर्ग व दुसरा वर्ण व्यंजन जोडला जाणे.

(4) एकत्र येणाऱ्या वर्णातील पहिला विसर्ग व दुसरा वर्ण स्वर जोडला जाणे.

**94.** 'आधीच मर्कट त्यात मद्य प्यालेला' – या म्हणीला समान अर्थ सांगणारी म्हण निवडा.

(1) आधीच तारे त्यात शिरले वारे
(2) आपलेच दात आपलेच ओठ
(3) माकडाच्या हाती कोलीत
(4) बावळी मुद्रा देवळी निद्रा

---

**95.** ज्या नामाने जातीचा बोध होत नसून त्या जातीतील एका विशिष्ट व्यक्तीचा, वस्तूचा बोध होतो. त्या नामास काय म्हणतात ?

(1) सामान्यनाम
(2) विशेषनाम
(3) भाववाचकनाम
(4) धर्मवाचकनाम

---

**96.** पुढील शब्दांतील सिद्ध शब्द ओळखा.

(1) उप (2) अनु (3) ता (4) ये

---

**97.** पुढीलपैकी पुल्लिंगी शब्द ओळखा.

(1) काया (2) पागोटे (3) इमारत (4) रूमाल

---

**98.** मूळ सिद्ध शब्दाच्या किंवा धातूच्या मागे एक किंवा अधिक अक्षरे लावून तयार होणाऱ्या शब्दांना ________ म्हणतात.

(1) देशी शब्द
(2) साधित शब्द
(3) तद्‌भव शब्द
(4) तत्सम शब्द

---

**99.** मराठीत एकूण किती विभक्ती मानल्या आहेत ?

(1) सात (2) नऊ (3) आठ (4) दहा

---

**100.** शुद्ध लेखनाच्या दृष्टीने पुढील शुद्ध शब्द ओळखा.

(1) पुर्नजन्म
(2) पुनर्विवाह
(3) पूनर्जन्म
(4) पूर्नविवाह

---

**101.** मराठीत कोणती विभक्ती प्रत्ययविरहीत आहे ?

(1) प्रथमा (2) संबोधन (3) सप्तमी (4) द्वितीया

---

**102.** दोन शब्द जोडतांना कोणते चिन्ह वापराल ?

(1) अपसरण चिन्ह
(2) स्वल्पविराम
(3) अपूर्ण विराम
(4) संयोग चिन्ह

---

कच्च्या कामासाठी जागा/SPACE FOR ROUGH WORK

103. पुढे दिलेल्या सर्वनामांपैकी कोणती सर्वनामे लिंगाप्रमाणे बदलतात ?

(1) तो, हा, जो
(2) मी, आम्ही
(3) आपण, स्वत:
(4) कोण, काय

---

104. 'कामात तो कधीच पुढे नसायचा' – या वाक्याचे विधानार्थी वाक्य ओळखा.

(1) कामात तो पुढे असायचा
(2) तो काम करत असे
(3) कामात तो मागे असायचा
(4) कामात तो नेहमी मागे असायचा

---

105. 'रस्त्याच्या बाजूने काही मुले चालली होती' या वाक्यात आलेल्या विशेषणाच्या बाबतीत पुढील कोणते विधान बरोबर आहे ?

(1) हे गणनावाचक संख्याविशेषण आहे
(2) हे क्रमवाचक संख्याविशेषण आहे
(3) हे पृथकत्ववाचक संख्याविशेषण आहे
(4) हे अनिश्चितवाचक संख्याविशेषण आहे

---

106. 'तुम्ही मतदानाचा हक्क बजवावा' या विध्यर्थी वाक्याचे आज्ञार्थी वाक्यात रूपांतर करा.

(1) तुम्ही मतदानाचा हक्क बजावून पहावा.
(2) तुम्ही मतदानाचा हक्क बजवा.
(3) तुम्ही मतदानाचा हक्क बजवायला नको का ?
(4) तुम्ही मतदानाचा हक्क बजावला पाहिजे.

---

107. खालील क्रियापदापैकी साधित क्रियापद ओळखा.

(1) कखते
(2) गडगडते
(3) गेला
(4) पाणावले

---

108. 'तो प्रसंग अत्यंत हृदयद्रावक होता' – या वाक्यातील प्रयोग ओळखा.

(1) भावे प्रयोग
(2) सकर्मक कर्तरी प्रयोग
(3) कर्मणी प्रयोग
(4) अकर्मक कर्तरी प्रयोग

---

109. 'दिव्यत्वाची जेथे प्रचिती, तेथे कर माझे जुळती' या वाक्यातील क्रियाविशेषण ओळखा.

(1) दिव्यत्वाची, माझे
(2) जेथे, तेथे
(3) प्रचिती, कर
(4) जुळती, जोडतात

---

कच्च्या कामासाठी जागा/SPACE FOR ROUGH WORK

110. मिश्र वाक्य ओळखा.

(1) माणूस कधीही पूर्णपणे वाईट किंवा पूर्णपणे चांगला असत नाही.

(2) जे दान एका हातानं दिलं आहे, ते दुसऱ्या हाताला कळू देऊ नकोस.

(3) समाज हा शत्रु मानून काम करता येणार नाही.

(4) केवळ तळमळ वाटल्याने लोकजीवनात परिवर्तन होत नसतं.

---

111. 'त्याच्याने हे काम होणार नाही'. या वाक्यात कोणता विभक्ती प्रत्यय आला आहे ?

(1) द्वितीया (2) तृतीया

(3) षष्टी (4) सप्तमी

---

112. रीती वर्तमान काळाचे वाक्य ओळखा.

(1) मी लेखन करीत राहीन (2) मी लेखन केले आहे

(3) माझे लेखन झाले आहे (4) मी लेखन करीत असतो

---

113. 'अरेरे ! सचिन तेंडूलकर आऊट झाला !' या वाक्यात आलेले अव्यय कोणत्या प्रकारचे आहे ?

(1) उभयान्वयी अव्यय (2) शब्दयोगी अव्यय

(3) केवलप्रयोगी अव्यय (4) कारणबोधक अव्यय

---

114. 'श्वेताने आज गजरा माळला' या वाक्यातील 'आज' या शब्दावर बलाघात दिला असता त्यातून स्पष्ट होणारा आशय निवडा.

(1) श्वेता शिवाय इतर कोणीही आज गजरा माळला नाही

(2) श्वेताने फक्त आजच गजरा माळला

(3) श्वेताने आज केसात गजराच माळला

(4) श्वेताने आज गजरा माळला, ठेवला नाही

---

115. 'आजीने नातीला गोष्ट सांगितली' या वाक्यातील क्रियापदाचा प्रकार ओळखा.

(1) सकर्मक क्रियापद (2) अकर्मक क्रियापद

(3) सहाय्यक क्रियापद (4) प्रायोजक क्रियापद

---

116. अर्धस्वर कोणते ते ओळखा.

(1) क्, ख् , ग् , घ्
(2) य् , र् , ल् , व्
(3) श् , स् , ष्
(4) च् , छ् , ज् , झ्

117. 'माझे वडील खूप श्रम करतात'. हे वाक्य कोणत्या प्रकारचे आहे ?

(1) विधानार्थी
(2) प्रश्नार्थी
(3) संयुक्त वाक्य
(4) नकारार्थी

118. भाववाचक नाम ओळखा.

(1) फुशारकी
(2) शहाणी मुले
(3) थोडी फळे
(4) बोलका पत्थर

119. ज्या वाक्यात एक उद्देश व एक विधेय असते त्यास ________________ वाक्य म्हणतात.

(1) संयुक्त वाक्य
(2) केवल वाक्य
(3) मिश्रवाक्य
(4) जोडाक्षरयुक्त वाक्य

120. 'ज्याला' या शब्दाचा सर्वनामाचा प्रकार कोणता ?

(1) प्रश्नार्थक सर्वनाम
(2) संबंधी सर्वनाम
(3) पुरुषवाचक सर्वनाम
(4) दर्शक सर्वनाम

121. 'परमेश्वरा सर्वांना सुखी ठेव' या वाक्याचा प्रकार सांगा.

(1) संकेतार्थ (2) स्वार्थी (3) आज्ञार्थी (4) विध्यर्थी

122. '<u>कमलनयन</u> रामाला पाहून सीतेला आनंद झाला'. अधोरेखित शब्दाचा समास ओळखा.

(1) द्वंद्व समास
(2) बहुव्रीही समास
(3) अव्ययीभाव समास
(4) तत्पुरुष समास

123. 'सचिनला भारतरत्न पुरस्कार मिळावा'. या वाक्याचा प्रकार कोणता आहे ?

(1) विध्यर्थी
(2) स्वार्थी
(3) आज्ञार्थी
(4) संकेतार्थी

124. 'सामान्यरूप' असलेली शब्दजोडी ओळखा.

(1) साठा-साठ्चे
(2) विहीर-विहिरीचे
(3) देखील-देखलेपण
(4) भरभर-भाराभार

125. 'पंतप्रधानांनी राजीनामा दिला नसता तर निवडणूक टळली असती'. या वाक्याचा प्रकार सांगा.

(1) संकेतार्थी
(2) आज्ञार्थी
(3) स्वार्थी
(4) विध्यर्थी

126. 'फिकट' या शब्दाचा विरुद्धार्थी शब्द ओळखा.

(1) फुकट
(2) विकट
(3) गडद
(4) चिकट

127. 'भारत हरता हरता जिंकला'. वाक्यप्रकार ओळखा.

(1) केवल वाक्य
(2) संयुक्त वाक्य
(3) मिश्र वाक्य
(4) संकेतार्थी वाक्य

128. खालीलपैकी 'दंतौष्ठ्य' वर्ण कोणता ?

(1) ओ (2) औ (3) व (4) च

129. 'मुख्यमंत्री म्हणाले, की प्रत्येकाने राष्ट्रसेवा करावी'. या वाक्याचा प्रकार ओळखा.

(1) केवल वाक्य
(2) मिश्र वाक्य
(3) संयुक्त वाक्य
(4) केवल संयुक्त वाक्य

130. 'अनुरक्ता' या शब्दाचा अर्थ

(1) जिचे गाल आरक्त आहेत
(2) प्रेमात पडलेली
(3) तारुण्यात पदार्पण केलेली
(4) पतीशी एकनिष्ठ असलेली

कच्च्या कामासाठी जागा/SPACE FOR ROUGH WORK

131. She <u>felt bad</u> about being rude to her teachers.

Choose the option indicating meaning of the underlined word :

(1) repressed (2) regretted (3) forgot (4) encouraged

---

132. If you ____________ her she would have come.

Use the correct verb form :

(1) call (2) called (3) had called (4) would call

---

133. The closer we got to the waterfall, ____________

Choose the correct option :

(1) the louder was the noise (2) the noise was louder

(3) the louder the noise was (4) the noise was the louder

---

134. Rabindranath Tagore ____________ the Nobel prize for literature.

Choose the correct option :

(1) awarded (2) is awarded

(3) was awarded (4) has been awarded

---

135. I ______________ her offer if I were you.

Choose the correct option :

(1) will accept (2) accept (3) would accept (4) accepted

---

Read the following passage carefully and answer the questions that follow :

So often these days we hear and speak of 'the conquest of Nature', 'the taming of a river', 'the war against insects', and so on. Often these phrases are used without consciously attaching any values to them, but they have underlying them an attitude of hostility towards Nature and Nature's creatures, a view point which seems to assume Nature as an enemy that needs to be vanquished. Alternatively, Nature is seen merely as a 'resource ' to be 'exploited' – take the maximum out of it, regardless of what this does to natural processes and to other creatures which depend on these processes. It is this attitude which sees fellow humans too as a resource to be exploited or other human communities as enemies to be conquered.

---

There is a growing lack of sensitivity and respect for our fellow creatures. This attitude is being drilled into child by social forces, which can only be countered by environmental education. Yet, sadly, in most cases this is not done. What is done is talk about the food web and the energy cycles and ecological balance and how removal of any element disrupts the whole system and how this can affect human beings too. What this approach lacks is the essential interaction with Nature and with other humans. Indeed in many environmental activities the opposite takes place. A classic example of this is making of a herbarium, or even worse, and insect collection, as common in both formal and non-formal education in India. A child is often encouraged to pluck leaves and flowers and run after butterflies with a net and is part of a large group of children similarly marauding a patch of nature individual "specimens" pressed in the plant file or trapped in a jar. It is even worse when the activity is also competitive i.e. who collects the maximum. A lot of knowledge may be gained, but it is gained in a value system which emphasizes exploitation and conquest, not sensitivity and respect. Learning under a tree, (Shantivan) rather than in a classroom, as is indeed the Indian tradition, is far more effective and long lasting.

The alternative is to take up activities where ecobalances, ecological diversity, animal behavior, human plurality and other such concepts and systems are introduced with the stress on their intrinsic worth. Materials, processes, living beings do not exist only for human use, but more importantly they are worthwhile in themselves.

A frog is as much in love with its life as the human child is with its; the feeling of the frog must be respected. The final thrust of environment education seems to be embodied in the vital question: Am I doing something which disrespects or violates some other creature's right to live and live freely ? If I am, what can I do to minimize the damage I am causing ?

Once again, the Indian tradition of ahimsa comes out as infinitely more relevant, than much of what we learn in modern education.

**136.** According to the writer the frequently used phrase 'conquest of Nature' by people indirectly suggests ______________

(1) man's superiority over Nature

(2) man's hostile attitude towards Nature and Nature's creatures

(3) Nature as man's enemy deserving to be vanquished.

(4) Nature as a resource to be exploited – take the maximum of it

137. The writer is of the view that ________

(1) there is growing lack of sensitivity and respect for the objects of Nature as living ones.

(2) there is growing lack of sensitivity and respect for the human beings.

(3) the present day education is killing sensitivity in child for others.

(4) as the child grows in age he becomes self-centred.

---

138. According to the writer the environmental education being given lacks ________

(1) interaction with other human beings

(2) interaction with Nature

(3) interaction with Nature and other humans

(4) interaction with other living beings

---

139. The writer says that the present day educational system ________

(1) emphasises conquest of Nature

(2) emphasises exploitation of Nature to benefit human being

(3) emphasises exploitation and conquest of Nature, not sensitivity and respect for it

(4) encourages the possessive instinct of the child

---

140. The writer finds 'ahimsa' today ________

(1) irrelevant in modern education

(2) more relevant than much of what we learn in modern education

(3) impracticable

(4) highly beneficial to all

---

141. Choose the correct alternative to fill in the blank :

The ________ part of the film was not very interesting.

(1) Late (2) Later (3) Latter (4) Latest

---

142. Choose the correct option and fill in the blank :

The ________ past of India is inspiring for today's generation.

(1) Dubious (2) Glorious

(3) Glory (4) Outrageous

---

कच्च्या कामासाठी जागा/SPACE FOR ROUGH WORK

**143.** Sachin Tendulkar is the best batsman in India.

Choose an option giving the comparative degree of the underlined adjective :

(1) No other batsman in India is as good as Sachin Tendulkar.
(2) All batsmen in India are inferior to Sachin Tendulkar.
(3) Sachin Tendulkar is better than any other batsmen in India.
(4) None of the above.

---

**144.** Choose the correct article from the options :

__________ gold is a precious metal.

(1) The (2) An (3) A (4) No article

---

**145.** She was a very attractive girl.

Choose the alternative giving an opposite of the underlined adjective :

(1) Bad (2) Worse (3) Repulsive (4) Good

---

**146.** Ladakh is colder than Kashmir.

Choose the alternative with positive degree :

(1) Ladakh is more colder than Kashmir.
(2) Kashmir is not so cold as Ladakh.
(3) Kashmir is less colder than Ladakh.
(4) Ladakh is cold compared to Kashmir.

---

**147.** The principal promised not to punish him if he called spade a spade.

The meaning of the phrase 'to call spade a spade' is __________

(1) Pay money (2) Flatter
(3) Call names (4) Tell frankly

---

**148.** My friend called my mother and ________ for lunch.

Choose the correct pronoun from the options :

(1) I (2) Me (3) My (4) Mine

---

**149.** Choose the appropriate relative pronoun :

All __________ I narrated was not understood by him.

(1) That (2) Which (3) Those (4) What

---

**150.** Choose suitable verb-form :

The train ____________ at 6.30 p.m. everyday.

(1) Arrives (2) Will arrive

(3) Arriving (4) Would arrive

---

**151.** Choose the correct article :

I met ____________ European in the market.

(1) A (2) An (3) The (4) None of these

---

**152.** Use the right preposition :

Why don't you go ____________ your friend ?

(1) With (2) By (3) Alongwith (4) Away

---

**153.** Use the right preposition :

____________ way of introduction he made, some patient remarks.

(1) Of (2) By (3) With (4) For

---

**154.** Choose the correct alternative :

She broke the glass ____________ a hundred pieces.

(1) Into (2) Of (3) For (4) With

---

**155.** The child ran ____________ the road, mother ran after him.

Choose the correct alternative :

(1) In (2) On (3) Across (4) By

---

**156.** Choose the correct alternative :

He is not well ____________ yesterday.

(1) Since (2) By (3) Of (4) Before

---

**157.** Choose the right preposition :

It is natural for a human being to wish ____________ money.

(1) Of (2) To (3) By (4) For

---

158. The audience applauded the dancer's performance.

Choose the alternative changing the voice.

(1) The dancer's performance was applauded by the audience.

(2) The dancer's performance applauded the audience.

(3) The audience would applaud the dancer's performance.

(4) None of the above.

---

159. Choose the correct alternative :

He walked so fast that I ____________ not overtake him.

(1) Can (2) Could (3) Will (4) Would

---

160. The campaign of the college festival is in full swing.

Choose the alternative explaining the meaning of the underlined idiom.

(1) Swinging (2) Fast

(3) Very active (4) Full

---

161. What a terrible fire this is

Choose the right punctuation at the end of the sentence –

(1) Full stop (2) Comma

(3) Exclamation (4) Question mark

---

162. The police caught the thief red-handed.

Choose the alternative indicating meaning of the underlined word.

(1) With red hands (2) Red free

(3) Hands turning red (4) In the very act of committing the theft

---

163. Choose the right alternative :

What ____________ would you give to new generation ?

(1) Advice (2) Advise (3) Advised (4) Advisory

---

164. Choose the reported speech alternative :

Meena said, "How clever I am !"

(1) Meena said, "I am very clever".

(2) Meena said she is clever.

(3) Meena exclaimed that she was very clever.

(4) Meena said that she is clever.

---

**165.** Choose the option indicating the meaning of the idiom :

The boss in my office does not know what happens under his nose.

(1) Below his nose (2) In his very presence

(3) With him (4) To his juniors

**166.** Convert into simple sentence:

The convict said that he was innocent.

(1) The convict said, "he is innocent".

(2) The convict said, "I am innocent".

(3) The convict talked he was innocent.

(4) The convict declared his innocence.

**167.** Use positive degree :

She is richer than me.

(1) I am not so rich as her. (2) She is more rich.

(3) I am poor. (4) She is rich, not me.

**168.** Choose the affirmative of the following :

Nobody was absent.

(1) All were present. (2) Everyone was present.

(3) Everyone was absent. (4) All were not absent.

**169.** Choose the option of complex sentence of the following :

She worked hard to get the promotion.

(1) She worked hard and got promotion.

(2) She worked hard getting promotion.

(3) She worked hard so that she might get promotion.

(4) None of the above.

**170.** Choose the alternative of simple sentence :

He wept since he was punished.

(1) He was punished, so he wept.

(2) He wept because he was punished.

(3) On being punished, he wept.

(4) He was weeping because of punishment.

कच्च्या कामासाठी जागा/SPACE FOR ROUGH WORK

171. Choose the correct article from the following to fill in the blank :
His sister is ____________ M.A. in History.
(1) a (2) an (3) the (4) no article

172. Choose the alternative of compound sentence :
When he saw the tiger, he paused.
(1) When he would see the tiger he would pause.
(2) Seeing the tiger, he paused.
(3) He paused while seeing the tiger.
(4) He saw the tiger and paused.

173. Choose the alternative using 'no sooner than' :
As soon as he entered, he removed his blazer.
(1) No sooner did he enter than he removed his blazer.
(2) No sooner he entered, he removed his blazer.
(3) No sooner he enters, he removes his blazer.
(4) None of the above

174. Choose the right alternative :
There should not be a prejudice ____________ any community.
(1) with (2) for (3) of (4) against

175. Choose the alternative indicating the meaning of the underlined word :
There is a dearth of research in pure sciences.
(1) dying (2) little (3) lot (4) damaging

176. Convert into reported speech :
The teacher said, "I am very busy now."
(1) The teacher said she is very busy now.
(2) The teacher said that she is very busy now.
(3) The teacher said that she was busy.
(4) The teacher said that she was very busy then.

177. Choose the right preposition :
She is indifferent ____________ what people talk.
(1) to (2) of (3) with (4) by

Read the passage and answer **178 to 183 :**

**India's Poverty Index / India Shining ?**

India's poverty index presents a dismal picture, as its poverty figures hover around 42 per cent in the year 2005. This raises a serious question about India's rhetoric of 'inclusive growth' or 'reforms with a human face'. The graphic depict India's comparative position with that of the other countries fighting this social malady, spanning a period between 1980 and 2005. One cannot but laud the success achieved by China, which began at 84% in the year 1980, but has its poverty figures at 14% in the year 2005. The same is the case with other developing countries, which successfully fought the shameful figure of 60% to reduce poverty to 15% in 2005. India can draw solace from the fact that sub-sahran countries have done worse than her. One must ask who is responsible for this pathetic state of affairs ? What is shining ? India or its poverty ?

**178.** The word 'dismal' means
(1) Depressing (2) Attractive (3) Good (4) Dismissed

**179.** Poverty is a noun, the adjective of the same is
(1) Pure (2) Poor (3) Povertiness (4) Power

**180.** The main theme of the passage is
(1) Poverty index of India (2) Figures of poverty
(3) China and India (4) Poverty graph

**181.** To laud the success means
(1) to talk about the success (2) to appreciate the success
(3) to love the success (4) to be proud of the success

**182.** State which of the following statements is true :
(1) Subsaharan countries have done worse than India in terms of poverty index.
(2) Poverty figures in China have increased.
(3) Poverty figures in India have increased.
(4) Developing countries have a rising poverty index.

**183.** 'Social malady' refers to
(1) Population (2) Growth
(3) Poverty (4) None of the above

**184.** Teacher asked two students the answer of a question, but __________ of them knew.
Choose the option to fill in the blank :
(1) none (2) either (3) both (4) neither

**185.** You always blow your own trumpet.
The meaning of the underlined phrase is __________
(1) speaking what one likes (2) speaking sense
(3) to boast (4) producing peculiar sound

**186.** Choose the correct option :
I __________ the child a few minutes ago.
(1) have seen (2) has seen (3) saw (4) had seen

**187.** She's right, __________ ?
Choose the correct option :
(1) is she (2) isn't it (3) she is (4) isn't she

**188.** I gave him __________ he wanted.
(1) that (2) what (3) which (4) that which

**189.** Fill in the gap with a suitable option :
He has looked __________, but he cannot find his spectacles.
(1) nowhere (2) everywhere (3) anywhere (4) somewhere

**190.** It is a public holiday. __________ is open today, bad luck !
Fill in the blank with correct option :
(1) everything (2) nothing (3) something (4) none of the above

**191.** Choose the correct answer from options below :
Potato and onion – which of these grow on trees ?
(1) One of them grow on trees (2) None of them grows on trees
(3) Some of them grows on trees (4) Few of them grows on trees

**192.** Choose the correct sentence :
(1) I usually play tennis on weekends.
(2) I am usually playing tennis on weekends.
(3) I was usually playing tennis on weekends
(4) None of the above

**193.** Choose the right article :

Mrs. Patil has __________ fever.

(1) a (2) an (3) the (4) no article

**194.** Fill in the blank with correct option :

I have not travelled by plane __________

(1) yet (2) till now
(3) as of now (4) none of the above

**195.** Choose the right option :

When I was a student, I __________ visit the library frequently.

(1) would (2) used to (3) could (4) none of these

**196.** Choose the correct option :

How many assignments __________ at a time ? How can you manage them ?

(1) did you take up (2) do you take up
(3) will you be taking (4) would you take

**197.** Choose the correct option of modal verb :

The people following him __________ his party supporters.

(1) may be (2) can be (3) would be (4) might be

**198.** Choose the right connector :

Gauri likes dancing __________ her sister likes reading.

(1) but (2) whereas (3) because (4) hence

**199.** Choose the right alternative :

Ram cannot walk very fast __________ he is very tall.

(1) though (2) but (3) since (4) so that

**200.** Choose the right option :

Television stifles rather than __________ the imagination.

(1) encourages (2) enhances
(3) stimulates (4) threatens

## सूचना – (पृष्ठ 1 वरून पुढे....)

(8) प्रश्नपुस्तिकेमध्ये विहित केलेल्या विशिष्ट जागीच कच्चे काम (रफ वर्क) करावे. प्रश्नपुस्तिकेव्यतिरिक्त उत्तरपत्रिकेवर वा इतर कागदावर कच्चे काम केल्यास ते कॉपी करण्याच्या उद्देशाने केले आहे, असे मानले जाईल व त्यानुसार उमेदवारावर शासनाने जारी केलेल्या "परीक्षांमध्ये होणाऱ्या गैरप्रकारांना प्रतिबंध करण्याबाबतचे अधिनियम-82" यातील तरतुदीनुसार कारवाई करण्यात येईल व दोषी व्यक्ती कमाल एक वर्षाच्या कारावासाच्या आणि/किंवा रुपये एक हजार रकमेच्या दंडाच्या शिक्षेस पात्र होईल.

(9) सदर प्रश्नपत्रिकेसाठी आयोगाने विहित केलेली वेळ संपल्यानंतर उमेदवाराला ही प्रश्नपुस्तिका स्वत: बरोबर परीक्षाकक्षाबाहेर घेऊन जाण्यास परवानगी आहे. **मात्र परीक्षा कक्षाबाहेर जाण्यापूर्वी उमेदवाराने आपल्या उत्तरपत्रिकेचा भाग –1 समवेक्षकाकडे न विसरता परत करणे आवश्यक आहे.**

---

### नमुना प्रश्न

प्रश्न क्र. **201.** "अंगावर काटा उभा रहाणे" या वाक्यप्रचाराचा अर्थ काय ?

(1) अंग शहारणे (2) रोमांचित होणे

(3) अतिशय भिती वाटणे (4) बहरुन येणे

ह्या प्रश्नाचे योग्य उत्तर "(3) अतिशय भिती वाटणे" असे आहे. त्यामुळे या प्रश्नाचे उत्तर "(3)" होईल. यास्तव **खालीलप्रमाणे** प्र. क्र. **201** समोरील उत्तर-क्रमांक "③" हे वर्तुळ पूर्णपणे छायांकित करून दाखविणे आवश्यक आहे.

प्रश्न क्र. **201.** ① ② ● ④

अशा पद्धतीने प्रस्तुत प्रश्नपुस्तिकेतील प्रत्येक प्रश्नाचा तुमचा उत्तरक्रमांक हा तुम्हाला स्वतंत्ररीत्या पुरविलेल्या उत्तरपत्रिकेवरील त्या त्या प्रश्नक्रमांकासमोरील संबंधित वर्तुळ पूर्णपणे छायांकित करून दाखवावा. **ह्याकरिता फक्त काळ्या शाईचे बॉलपेन वापरावे, पेन्सिल वा शाईचे पेन वापरू नये.**

---

**कच्च्या कामासाठी जागा/SPACE FOR ROUGH WORK**

SEAL